ताजबाग विकास आराखडा
निधी वितरणाबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : ताविआ २०१६/प्र.क्र.१०/का.१४४३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १७ मार्च, २०१७

वाचा :

१) शासन निर्णय क्रमांक : ताविआ २०१३/ प्र.क्र. १६/का.१४४३, दि.३०.९.२०१३.
२) नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर यांचे जावक क्रमांक : स.अ.( प्र २ ) /ताजबाग/३२४, दि.४.२.२०१७ चे पत्र.
३) जिल्हाधिकारी कार्यालय, नागपूर यांचे क्र.जिनिस/कार्या-३७ / ताजबाग /२०६ / २०१७, दि.९.२.२०१७ चे पत्र.
४) विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर यांचे क्र. निशा/सांस/ ताविआ/ २०१७/२२४६, दि.१४.२.२०१७ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

नागपूर शहरातील हजरतबाबा ताजुद्दिन यांचा ताजबाग येथील दर्गा विदेशातील भाविकांचे श्रध्दास्थान असल्याने त्या जागेचे महत्व लक्षात घेऊन या परिसराचा विकास करण्यासाठी ताजबाग विकास आराखडा तयार करण्याच्या कामांसाठी दि.३०.९.२०१३ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेल्या कामांसाठी विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर यांच्या दि.१४.२.२०१७ च्या पत्रान्वये मागणी केल्यानुसार सन २०१६-१७ या वित्तीय वर्षासाठी उर्वरित निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

नागपूर शहरातील हजरतबाबा ताजुद्दिन यांचा ताजबाग येथील दर्ग्याच्या परिसराचा विकास करण्यासाठी ताजबाग विकास आराखडा तयार करण्यात आला असून सन २०१६-१७ या वित्तीय वर्षात रु.७००.०० लक्ष इतका नियतव्यय डिसेंबर २०१६ च्या हिवाळी अधिवेशनात पूरक मागणीद्वारे अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर यांनी दि.१४.२.२०१७ च्या पत्रान्वये केलेल्या मागणीनुसार रु.७००.०० लक्ष उर्वरित निधी वितरीत करण्यात येत आहे. दि.३०.९.२०१३ च्या शासन निर्णयातील अटींची पूर्तता करुन वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तात्काळ सादर करावे. तसेच शासन परिपत्रक दि.२०.४.२०१६ मधील तरतूदीस अनुसरुन या योजनेस ( भांडवली ) १०० टक्के म्हणजे रु.७००.०० लक्ष ( रुपये सातशे लक्ष फक्त ) निधीची विभागीय आयुक्त, नागपूर विभाग,नागपूर यांनी मागणी केल्यानुसार खालीलप्रमाणे उद्दिष्टनिहाय वाटप करण्यात येत आहे.

| उद्दिष्टनिहाय बाब | रुपये ( लाखात ) |
|---|---|
| ५३, मोठी बांधकामे | ७००.०० |

२. सदरहू खर्च लेखाशीर्ष " मागणी क्र. ओ-१०, मुख्य लेखाशीर्ष भांडवली खर्च,( ०१ ) पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१, पर्यटन केंद्रे (००),(००)(०२) ताजबाग विकास योजना, जिल्हा नागपूर ( ५४५२ ००७१ ) योजनांतर्गत " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. वर नमूद केलेल्या लेखाशीर्षातर्गत झालेल्या प्रत्यक्ष खर्च व महालेखापाल कार्यालयाने नोंदविलेल्या खर्चाच्या दरमहा ताळमेळ घालण्यात यावा. वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तात्काळ सादर करावे.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०१६/प्र.क्र.८९/ अर्थ-३, दि.२०.०४.२०१६ व वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. पूरक २०१६/प्र.क्र.२०१/ अर्थ-३, दि.४.१.२०१७ अनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३१७१५२६२२१६१६ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने सांक्षकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Yatin Arvind Pimpley

Digitally signed by Yatin Arvind Pimpley
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0caa48d6ba1e76bde48feb1f45845828c28993 3f651f16d330b6ebf2a692991f, cn=Yatin Arvind Pimpley
Date: 2017.03.17 15:28:30 +05'30'

**( य.अ.पिंपळे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा ),महाराष्ट्र-१,मुंबई.
२. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा ),महाराष्ट्र-२, नागपूर.
३. वित्त विभाग ( व्यय-८ ) / ( व्यय-१६ ), मंत्रालय, मुंबई.
४. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
५. जिल्हाधिकारी, नागपूर.
६. सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर.
७. आयुक्त, महानगरपालिका, नागपूर.
८. अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागपूर.
९. जिल्हा नियोजन अधिकारी, नागपूर.
१०. निवड नस्ती, का.१४४३,नि.वि.,मंत्रालय, मुंबई.